सन २०२२-२३ च्या अर्थसंकल्पीय तरतुदीमधून शासनमान्य सार्वजनिक ग्रंथालयांना सहाय्यक अनुदान (अनिवार्य) वितरीत करणेबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: मराग्रं २०२२/प्र.क्र.७६/साशि-५,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २९ मार्च,२०२३.

**संदर्भ :** १) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३,दि.०४.०४.२०२२ व दि.१६.०३.२०२३.
२) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्र. एसयुएस-२०२२/प्र.क्र.०३/विशि-२, दि.०५.०४.२०२२
३) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, समक्रमांक दि.२३.०६.२०२२,दि.२१.०७.२०२२, दि.२६.०७.२०२२, दि.०४.१०.२०२२,दि.०९.०३.२०२३ व दि.२४.०३.२०२३
४) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्र. पुरक-२०२३/प्र.क्र.४२/साशि-५, दि.२७.०३.२०२३
५) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्र. मराग्रं २०२२/प्र.क्र.२१/साशि-५,दि.२१.१२.२०२२

**प्रस्तावना :**

शासनमान्य सार्वजनिक ग्रंथालयांना सहाय्यक अनुदानासाठी मागणी क्र. डब्ल्यू-४, २२०५, कला व संस्कृती,१०५, सार्वजनिक ग्रंथालये, (०३)(०१) मध्यवर्ती, जिल्हा व तालुका ग्रंथालयांना सहाय्य ( अनिवार्य ) (२२०५ ०२९८) ३१-सहाय्यक अनुदाने ( वेतनेतर ) या लेखाशिर्षांतर्गत सन २०२२-२३ च्या सुधारीत अंदाजामध्ये रु. २१२,९१,२८,०००/-( अक्षरी रुपये दोनशे बारा कोटी एक्याण्णव लाख अठ्ठावीस हजार फ़क्त ) इतका निधी मंजूर करण्यात आला आहे. सदर मंजूर निधीतील रु.२०६,६०,८४,०००/- ( अक्षरी रुपये दोनशे सहा कोटी साठ लाख चौ-याऐंशी हजार फ़क्त) इतका निधी वितरीत करण्यास संदर्भाधिन क्र. २,३ व ४ येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. आता, सन २०२२-२३ मधील शासनमान्य सार्वजनिक ग्रंथालयांच्या परिरक्षण अनुदानाचा उर्वरीत दुसरा/एकत्रित हप्ता अदा करण्यासाठी तसेच संदर्भाधिन क्र. ५ येथील शासन निर्णयान्वये शासनमान्य सार्वजनिक ग्रंथालयांच्या विद्यमान परिररक्षण अनुदान दरात करण्यात आलेली ६० % वाढ विचारात घेता, सदर वाढीव अनुदान अदा करण्यासाठी सुधारीत अंदाजाच्या मर्यादेत शिल्लक असलेला रु.६,३०,४४,०००/- (अक्षरी रुपये सहा कोटी तीस लाख चव्वेचाळीस हजार फ़क्त ) इतका निधी ग्रंथालय संचालक, ग्रंथालय संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना वितरीत करून खर्च करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :**

सन २०२२-२३ मधील शासनमान्य सार्वजनिक ग्रंथालयांच्या परिरक्षण अनुदानाचा उर्वरीत दुसरा/एकत्रित हप्ता अदा करण्यासाठी तसेच शासनमान्य सार्वजनिक ग्रंथालयांच्या विद्यमान परिरक्षण अनुदान दरात करण्यात आलेल्या ६० % वाढीच्या अनुषंगाने, सदर वाढीव अनुदान अदा करण्यासाठी सुधारीत अंदाजाच्या मर्यादेत शिल्लक असलेला रु.६,३०,४४,०००/- ( अक्षरी रुपये सहा कोटी तीस लाख

चव्वेचाळीस हजार फ़क्त ) इतका निधी ग्रंथालय संचालक, ग्रंथालय संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना वितरीत करून खर्च करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

यानुषंगाने संबंधित जिल्हा ग्रंथालय अधिकारी / कार्यालय प्रमुखांना "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच त्यांना ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) या उद्दिष्टाखालील देयकावर "नियंत्रक अधिकारी" म्हणून प्रतिस्वाक्षरी करण्याचे अधिकार देखील प्रदान करण्यात येत आहेत.

२. सदर खर्च मागणी क्र. डब्ल्यू-४, २२०५, कला व संस्कृती,१०५, सार्वजनिक ग्रंथालये, (०३) मध्यवर्ती, जिल्हा व तालुका ग्रंथालयांना सहाय्य, (०३) (०१) मध्यवर्ती, जिल्हा व तालुका ग्रंथालयांना सहाय्य (अनिवार्य) (२२०५ ०२९८) ३१-सहाय्यक अनुदाने ( वेतनेतर ) या लेखाशिर्षाखाली सन २०२२-२३ मध्ये अर्थसंकल्पीत तरतूदीपैकी वितरीत केलेल्या निधीतून भागविण्यात यावा.

३. अनुदानाच्या रक्कमेची उपयोगिता प्रमाणपत्रे संबंधित कार्यालय प्रमुखांनी विहित मुदतीत सादर करणे आवश्यक राहील.

४. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दि.०४.०४.२०२२ मधील अटींची पुर्तता करण्यात आली असून सदर शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.३८१/व्यय-५, दि.२७.०३.२०२३ अन्वये प्राप्त सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२३०३२९१६२५४८८५०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Digitally signed by HEMANT SUDHAKAR PATHAK
Date: 2023.03.29 16:32:19 +05'30'

**( हे.सु.पाठक )**
**अवर सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,मुंबई
२. मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण विभाग यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई
४. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. प्रधान सचिव,उच्च व तंत्र शिक्षण विभाग,मंत्रालय,मुंबई
६. ग्रंथालय संचालक, ग्रंथालय संचालनालय, महाराष्ट्र राज्य,मुंबई
७. महालेखापाल -१/२ (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर
८. अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई
९. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१०. निवासी लेखापरीक्षा अधिकारी,मुंबई
११. सर्व सहायक ग्रंथालय संचालक/ जिल्हा ग्रंथालय अधिकारी (ग्रंथालय संचालनालयामार्फ़त)
१२. अवर सचिव (साशि-१), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय,मुंबई
१३. निवडनस्ती ( साशि-५ ), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय,मुंबई.